**<u>शक्ती प्रदत्त समिती स्थापन करणेबाबत</u>**
**सांसद आदर्श ग्राम योजना**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः व्हीपीएम-२०१४/प्र.क्र.१८३/पंरा-३**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई - ४०० ००१
तारीख: २४ फेब्रुवारी, २०१५

<u>वाचा -</u>

**१) शासन निर्णय क्रमांकः व्हीपीएम-२०१४/प्र.क्र.१८३/पंरा-३, दिनांक ३१ डिसेंबर, २०१४**

<u>प्रस्तावना -</u>

केंद्र शासनाने ऑक्टोबर, २०१४ मध्ये सांसद आदर्श ग्राम योजना कार्यान्वीत केली आहे. सदर योजनेच्या मार्गदर्शक सूचनेनुसार मा. संसद सदस्यांनी एका ग्रामपंचायतीचा सर्वतोपरी विकास करणे हा मुख्य उद्देश आहे.

केंद्र व राज्य शासनाच्या सुरु असलेल्या विविध योजना व कार्यक्रम परिणामकारकरित्या व सुयोग्य नियोजनाव्दारे गावाच्या विकासासाठी राबविण्यात येणार आहेत. सांसद आदर्श ग्राम योजनेचा केंद्रबिंदू हा लोकसहभाग असून यामध्ये गावाचा सर्वांगीण विकास तसेच स्वच्छता, महिलांचा व युवकांचा विकास देखिल अंतर्भाव आहे.

सांसद आदर्श ग्राम योजनेमध्ये याआधीच जिल्हाधिकारी यांची समन्वय अधिकारी (Nodal officer) म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. केंद्र शासनाने निदेश दिल्यानुसार मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली सर्व विभागांच्या सचिवांची मिळून या योजनेतंर्गत शक्ती प्रदत्त समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सांसद आदर्श ग्राम योजनेखाली राज्य शासनामार्फत सांसद आदर्श ग्राम योजना मार्गदर्शक सूचना परिच्छेद १२ (सी) नुसार खालीलप्रमाणे शक्ती प्रदत्त समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | मा. मुख्य सचिव | - | अध्यक्ष |
| २) | मा. अपर मुख्य सचिव (नियोजन) | - | सदस्य |
| ३) | मा. अपर मुख्य सचिव (कृषी) | - | सदस्य |
| ४) | मा. प्रधान सचिव (शालेय शिक्षण) | - | सदस्य |
| ५) | मा. प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता) | - | सदस्य |
| ६) | मा. प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य) | - | सदस्य |
| ७) | मा. प्रधान सचिव (रोहयो व जलसंधारण) | - | सदस्य |
| ८) | मा. प्रधान सचिव (पदुम) | - | सदस्य |
| ९) | मा. प्रधान सचिव (महिला व बाल विकास | - | सदस्य |
| १०) | मा. प्रधान सचिव (सामाजिक न्याय) | - | सदस्य |
| ११) | मा. प्रधान सचिव (आदिवासी विकास) | - | सदस्य |
| १२) | मा. प्रधान सचिव (ऊर्जा) | - | सदस्य |
| १३) | मा. प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान) | - | सदस्य |
| १४) | तज्ज्ञ / नागरी संस्थांचे प्रतिनिधी (२) | - | सदस्य |
| १५) | मा. प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) | - | सदस्य सचिव |

**उपरोक्त समिती तीन महिन्यातून एकदा समितीची बैठक आयोजित करील व त्यामध्ये खालील बाबींवर मुख्यत्वे करुन चर्चा करील.**

अ) सर्व संबंधित विभागामध्ये योग्य समन्वय साधणे.

ब) विविध योचनांचा कृतीसंगम (Convergence of Programmes) करणेसाठी उपाययोजना करणे.

क) योजना अंमलबजावणीमध्ये उद्भवणा-या विविध अडचणी संदर्भात तात्काळ प्रशासकीय निर्णय घेण्यासाठी कार्यपध्दती निश्चित करणे तसेच केंद्र शासनाकडे पाठपूरावा करणे.

ड) परिणामकारक नियंत्रण करणे.

ई) शासनस्तरावर तात्काळ निर्णय घेण्यासाठी यंत्रणा तयार करुन शासनास्तरावर येणाऱ्या विविध तक्रारींचे निवारण करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२४१७०४३९१२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

V Giriraj

Digitally signed by V Giriraj
DN: c=IN, o=All India Service, ou=Principal Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=V Giriraj
Date: 2015.02.24 17:52:03 +05'30'

**( वि. गिरिराज )**
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ३२.
२) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव (सर्व विभाग),
३) सह सचिव (भाप्रसे), ग्राम विकास व पंचायती राज मंत्रालय, भारत सरकार
४) मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य (सर्व)
५) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई, (दोन प्रती)
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई, (दोन प्रती)
७) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर, (दोन प्रती)
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर, (दोन प्रती)
९) सर्व विभागीय आयुक्त,
१०) सर्व जिल्हाधिकारी,
११) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१२) ग्राम विकास विभागातील सर्व कार्यासने
१३) निवडनस्ती (कार्यासन क्रमांक पंरा-३),